माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत प्रकाशित करण्यात येणारे " हिंदी व गुजराथी लोकराज्य " हे मासिक खाजगीरित्या मुद्रीत करुन घेणे, आवेष्टन आणि पत्ते चिकटवून वितरीत करण्याबाबत व तसेच छपाईच्या कामाबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मावज- २०१७ /प्र.क्र.४२ /का.३४**

हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा मार्ग

मंत्रालय, मुंबई-४००० ३२

दिनांक: ०३ ऑगस्ट, २०१७

**वाचा -** शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग,क्र.मावज-२०१७/प्र.क्र.१५०/का.३४.

दिनांक २१ जुलै, २०१७

**प्रस्तावना:-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत हिंदी व गुजराथी लोकराज्य हे मासिक दरमहा प्रकाशित करण्यात येते. सदर मासिक हे शासनाचे ध्येयधोरण व योजना जनतेपर्यंत पोहचविण्याचे प्रभावी माध्यम आहे. शासकिय मुद्रणालनालयामध्ये अत्याधुनिक यंत्रसामग्री नसल्यामुळे चार रंगात नविन आकर्षक स्वरुपात तसेच विहीत कालमर्यादेत मासिकाची छपाई शासकिय मुद्रणालयात सद्यस्थितीत होवू शकत नसल्यामुळे उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या सहमतीने हिंदी व गुजराथी लोकराज्य हे मासिक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत खाजगी मुद्रणालयाकडून मुद्रीत करुन घेण्यास व खाजगीरित्या आवेष्टन करुन त्यावर पत्ते चिकटवून वितरीत करण्यास एप्रिल,२०१७ ते मार्च,२०१८ या एक वर्षाकरिता खाजगी मुद्रणालयाकडून छपाई करुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. शासकिय मुद्रणालयात चार रंगी छपाई यंत्रणा उपलब्ध नसल्याने, सदर यंत्रणा अद्ययावत होईपर्यंत माहे एप्रिल,२०१७ ते मार्च,२०१८ या एक वर्षाच्या कालावधीसाठी हिंदी व गुजराथी लोकराज्य मासिकांची छपाई ई निविदा मागवून व विहित शासन कार्यपध्दतीचा अवलंब करुन खाजगी मुद्रणालयाकडून करुन घेण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. हिंदी व गुजराथी लोकराज्य मासिक छपाईसाठी येणारा खर्च, सामान्य प्रशासन विभाग क्र. ए-६-२२२० ,माहिती व प्रसिद्धी-०१, चित्रपट-००१, संचालन व प्रशासन (००) (०१) प्रसिद्धी संचालक १६ प्रकाशने संगणक संकेतांक (२२२०००४३) या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या वर्षामध्ये मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय शासकिय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालनालय, मुंबई यांच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.कार्या-२ अ/मु.१/२०१६-१७/३१६२, दिनांक २१ मार्च,२०१७ व उद्योग,उर्जा व कामगार विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ३८/उ- ४ दिनांक २१/३/२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०३१३३२१८३३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramkisan
Narayanrao
Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2017.08.03 13:23:23 +05'30'

**( रा.ना.मुसळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई-३२
२. संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
३. संचालक, शासकिय मुद्रण व लेखन सामुग्री संचालनालय, चर्नी रोड,मुंबई
४. महालेखापाल, १ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षा),१/२ मुंबई/नागपूर
५. मा.मुख्यमंत्र्यांचे जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय,मुंबई
६. मा.राज्यमंत्री (मा.वज.) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई
७. सचिव (मा.वज.)यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. उपसंचालक, लेखा, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. उपसचिव, उद्योग उर्जा व कामगार विभाग (उद्योग-४)
१०.अधिपरिक्षक, पुस्तके व प्रकाशने, जुने जकात घर,फोर्ट, मुंबई
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
१३. निवड नस्ती/का.३४.

.